**विदर्भ विकास कार्यक्रम २००९-१०**
**भारतरत्न डॉ.बाबासाहेब आंबेडकर कन्व्हेशन सेंटर, नागपूर येथील बांधकामासाठी निधी उपलब्ध करून देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः सान्यावि -२०१७/प्र.क्र.६२/बांधकामे**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय विस्तार, मुंबई- ४०० ०३२
दिनांक: ०१ जानेवारी, २०२०.

**वाचा :-**

१. शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्र.बीसीएच-२०११/ प्र.क्र.६१/ बांधकामे, दि.१४/०३/२०११.
२. शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्र.बीसीएच-२०११/ प्र.क्र.६१/ बांधकामे, दि.११/०९/२०१४.
३. शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्र.बीसीएच-२०१४/ प्र.क्र.६१/ बांधकामे, दि.१६/१२/२०१५.
४. शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्र.सान्यावि-२०१७/ प्र.क्र.६२ बांधकामे, दि.३१/०३/२०१७.
५. नागपूर महानगर प्रदेश विकास प्राधिकरण यांचे पत्र जा.क्र.का.अ.(प्र.)/४८९, दि. १७/०९/२०१९ रोजीचे पत्र.
६. प्रधान सचिव (सा.न्या. व वि.स.) महोदयांच्या अध्यक्षतेखाली दि. १८.१२.२०१९ रोजी नागपूर येथील सामाजिक न्याय भवन, येथे झालेल्या बैठकीचे इतिवृत्त.

**प्रस्तावना :-**

विदर्भ विकास कार्यक्रमाअंतर्गत संदर्भ क्र. ०१ अन्वये मौजे इंदोरा, नागपूर येथील कामठी रोड लगत डॉ. बाबासाहेब आंबेडकर कन्व्हेंशन सेंटर नागपूर येथील बांधकामाकरीता रू.२२.०० कोटी (अक्षरी रूपये बाविस कोटी फक्त)इतका निधी वितरीत करण्यात आला आहे. तसेच संदर्भ क्र. ०२ अन्वये सदर कामास रू.११३.७४ कोटी ( अक्षरी रूपये एकशे तेरा कोटी चौऱ्याहत्तर लक्ष फक्त) इतक्या खर्चास प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. त्याअंतर्गत आतापर्यंत नागपूर महानगर प्रदेश विकास प्राधिकरण, नागपूर यांना संदर्भ क्र. ०१ अन्वये रू.२२.०० कोटी (अक्षरी रूपये बाविस कोटी फक्त) व संदर्भ क्र.०४ अन्वये रू.५१.८२ कोटी (अक्षरी रूपये एकावन्न कोटी ब्याऐंशी लक्ष फक्त )असे एकूण रू.७३.८२ कोटी (अक्षरी रूपये त्र्याहत्तर कोटी ब्याऐंशी लक्ष फक्त) इतका निधी लेखाशिर्ष २२२५ ३६३६ अंतर्गत नागपूर महानगर प्रदेश विकास प्राधिकरण, नागपूर यांना उपलब्ध करून दिलेला आहे. या कामाकरीता मंजूर निधीपैकी उर्वरित रू.३९.९२ कोटी (अक्षरी रूपये एकोणचाळीस कोटी ब्यान्नव लक्ष फक्त) इतका निधी नागपूर महानगर प्रदेश विकास प्राधिकरण, नागपूर यांना उपलब्ध करून देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

भारतरत्न डॉ.बाबासाहेब आंबेडकर कन्व्हेशन सेंटर, कामठी रोड नागपूर येथील बांधकामासाठी मंजूर रू.११३.७३ कोटी (अक्षरी रूपये एकशे तेरा कोटी त्र्याहत्तर लक्ष फक्त)निधीतील उर्वरित देय रू.३९.९२ कोटी (अक्षरी रूपये एकोणचाळीस कोटी ब्यान्नव लक्ष फक्त) इतक्या निधीपैकी रू. १३.३३ कोटी (अक्षरी रूपये तेरा कोटी तेहत्तीस लक्ष फक्त) इतका निधी वितरीत करण्यास संदर्भ क्र. ०१ येथील दि. १४.०३.२०११ रोजीच्या व संदर्भ क्र. ०३ येथील दि. १६/१२/२०१५ शासन निर्णयात नमूद अटींच्या तसेच खालील नमूद करण्यात आलेल्या अटींच्या अधीन राहून या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

१) प्रत्यक्ष काम करतेवेळी पर्यावरण विभाग, शासन निर्णय क्र.इएनव्ही-२०१३/ प्र.क्र.१७७/ता.क्र.१, दि.१० जानेवारी,२०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वांनुसार कार्यवाही करण्यात यावी.

२) प्रस्तूत प्रकल्पातील इमारत बांधकामामध्ये ग्रीन बिल्डींग संकल्पना अंमलात आणून, नैसर्गिक प्रकाश योजना व वायुविजन, पाण्याच्या व ऊर्जेच्या वापरात काटकसर पर्जन्य जलपुनर्भरण आणि जास्तीत जास्त पर्यावरण पुरक बांधकाम साहित्य व साधन सामुग्रीचा वापर करणे आवश्यक राहील.

३) प्रस्तुत प्रकल्पातील बांधकामाचा कालावधी निश्चित करून ते विहीत वेळेतच पूर्ण होईल याची संबंधित सहाय्यक आयुक्त, समाजकल्याण यांना दक्षत घ्यावी.

४) प्रकल्पाच्या देखभाल व परिरक्षणाची जबाबदारी ही नागपूर महानगर प्रदेश विकास प्राधिकरण यांची राहील.

५) प्रस्तुत प्रकल्पामध्ये अपंगांना सोयी सुविधा उपलब्ध होण्याच्या दृष्टीने रॅम्प, रेलींग व तत्सम सुविधा निर्माण करणे बंधनकारक राहील.

२. संदर्भ क्र. १ येथील शासन निर्णयात नमूद मार्गदर्शक तत्वांचे पालन करुन नागपूर महानगर प्रदेश विकास प्राधिकरण यांनी हाती घेतलेल्या प्रकल्पावर संनियंत्रण ठेवण्याची जबाबदारी संदर्भ क्र. ०३ येथील शासन निर्णयान्वये गठीत करण्यात आलेल्या जिल्हास्तरीय समितीची राहील. सहाय्यक आयुक्त, समाजकल्याण, नागपूर यांनी प्रकल्पाच्या बांधकामाचा सद्य:स्थितीचा त्रैमासिक अहवाल आणि वितरीत केलेल्या निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास व आयुक्त, समाजकल्याण, पुणे यांना वेळीच सादर करण्याची दक्षता घ्यावी.

३. सदर बांधकामावरील खर्च हा मागणी क्र.एन-३, २२२५-अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती व इतर मागासवर्गीय व अल्पसंख्यांक यांचे कल्याण, ०१- अनुसूचित जातीचे कल्याण, ८००-इतर खर्च, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना-राज्य योजनांतर्गत योजना (०५), स्वयंसेवी संस्थांना सहाय्यक अनुदाने (०५)(०२), स्वयंसेवी संस्थांना सहाय्यक अनुदाने (वि.घ.यो.) (२२२५ ३६३६), ३१ - सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) (योजनातर्गत-दत्तमत्त) या लेखाशीर्षाखाली सन २०१९-२० या वर्षात मंजूर अर्थसंकल्पीय तरतूदीतून भागविण्यात यावा.

४. सदर योजनेअंतर्गत आयुक्त, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना नियंत्रक, आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. तसेच योजनेअंतर्गत मंजूर निधीचे वितरण हे संदर्भ क्र. १ येथील शासन निर्णयातील परिच्छेद २ (२) मध्ये नमूद अटीच्या अधीन काटेकोरपणे करण्याची जबाबदारी आयुक्त, समजाकल्याण, पुणे यांची राहील.

हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून, त्याचा संगणक सांकेतांक क्र. २०२००१०११७४२११६९२२ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Anil Kondaji Ahire

Digitally signed by Anil Kondaji Ahire
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Social Justice and Special Assistance Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=9004dcdaa635070d60922aaa5dec8888d343a47356798e6c9cf27e4353d60e51, cn=Anil Kondaji Ahire
Date: 2020.01.01 17:47:50 +05'30'

**( अनिल कों.आहिरे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा , मंत्री (सा.न्या. व वि.स.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई
२) मा. राज्यमंत्री (सा.न्या. व वि.स. ) यांचे खाजगी सचिव,मंत्रालय,मुंबई
३) आयुक्त, समाजकल्याण, पुणे.
४) महानगर आयुक्त, नागपूर महानगर प्रदेश विकास प्राधिकरण, नागपूर
५) अधिक्षक अभियंता, नागपूर महानगर प्रदेश विकास प्राधिकरण नागपूर.
६) महालेखापाल महाराष्ट्र १/२ (लेखापरीक्षा/लेखाअनुज्ञेयता ), मुंबई/नागपूर.
७) प्रादेशिक उपायुक्त, समाजकल्याण विभाग, नागपूर.
८) सहायक आयुक्त, समाजकल्याण, नागपूर.
९) जिल्हाकोषागार अधिकारी, पूणे/नागपूर.
१०) निवडनस्ती बांधकामे